**सार्वजनिक हिताच्या पायाभूत सुविधा प्रकल्पांच्या अंमलबजावणीमुळे बाधित होणाऱ्या प्रकल्पबाधित व्यक्तींसाठी प्रकल्पबाधित सदनिका निर्माण करुन <u>वितरीत करण्याबाबतचे धोरण .</u>**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक याचिका-२०२३ /प्र.क्र.२२०(भाग-१)/झोपनि-२**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १९ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ :-** (१) गृहनिर्माण विभाग, शासन निर्णय क्रमांक याचिका-२०२३/प्र.क्र.२२०/ झोपनि-२, दिनांक २२/११/२०२३.

(२) सेवानिवृत्त मुख्य न्यायाधिश,मा.उच्च न्यायालय,अलाहाबाद यांच्या अध्यक्षतेखालील कृती दलाचे दिनांक १५/०१/२०२४ चे पत्र.

**<u>प्रस्तावना</u> :-**

सार्वजनिक हितासाठी बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत विविध महत्वाचे पायाभूत सुविधांचे प्रकल्प हाती घेण्यात येत असतात. मुंबई व मुंबई उपनगरातील कोणत्याही जमिनीवर असा कोणताही पायाभूत प्रकल्प राबविणे शक्य नाही की जेथे पायाभूत प्रकल्प राबविताना तेथील लोकांचे जीवनमान किंवा घरे बाधित होऊ शकणार नाहीत. कोणत्याही पायाभूत सुविधा प्रकल्पाच्या यशस्वी आणि वेळेत अंमलबजावणी होण्यासाठी पायाभूत सुविधा प्रकल्पांमुळे बाधित होणाऱ्या पात्र प्रकल्पग्रस्त व्यक्तींचे पुनर्वसन होणे ही पूर्व आवश्यकता आहे. प्रकल्पग्रस्तांचे पुनर्वसन वेळेत न केल्यामुळे त्यांच्याकडून अपेक्षित सहकार्य मिळत नाही, त्यामुळे न्यायालयीन प्रकरणे उद्भवतात व परिणामी काही प्रकल्प वेळेत पूर्ण होत नाहीत. शिवाय, प्रकल्प वेळेत पूर्ण न झाल्यामुळे प्रकल्पाची किंमत देखील वाढते. त्यामुळे प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणेला प्रकल्पासाठी अधिकचा आर्थिक भार सोसावा लागतो.

२. सार्वजनिक हिताच्या पायाभूत सुविधा प्रकल्पाने बाधित झालेल्या नागरिकांना विहीत कालावधीत प्रकल्पग्रस्त सदनिकांचे वाटप न झाल्याने अनेक प्रकल्पांना विलंब होत असल्याचे रिट याचिका क्र. ८९७३/२०२३ च्या सुनावणीच्यावेळी मा.उच्च न्यायालयाच्या निदर्शनास आलेले आहे. या रिट याचिकेमध्ये दि.०३/११/२०२३ रोजी पारित केलेल्या आदेशात प्रकल्पग्रस्तांसाठी सदनिका वाटपाचे धोरण शासनस्तरावर निश्चित करण्याबाबत मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी आदेश पारित केलेले आहेत. सदर आदेशास अनुसरुन प्रकल्पग्रस्त सदनिका निर्माण करुन वितरीत करण्याबातचे धोरण ठरविण्याकरिता शासनास शिफारशी करण्यासाठी सेवानिवृत्त मुख्य न्यायाधिश,

मा.उच्च न्यायालय, अलाहाबाद यांच्या अध्यक्षतेखाली कृती दलाची (टास्क फोर्स) स्थापना संदर्भ क्र.१ येथील दि.२२/११/२०२३ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली होती. सदर कृती दलाने त्यांचा अहवाल संदर्भ क्र.२ येथील दि.१५/०१/२०२४ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेला आहे. सदर अहवालातील शिफारशी विचारात घेऊन प्रकल्पग्रस्त सदनिकांच्या वाटपाचे धोरण निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय**-

मुंबईतील विविध पायाभूत सुविधांचे प्रकल्प मार्गी लावण्यासाठी सद्य:स्थितीत अंदाजे ५०,००० पी.ए.पी. सदनिकांची आवश्यकता असून, मुंबईचा विकास आराखडा (DP) राबविण्यासाठी २,२०,००० पी.ए.पी. सदनिकांची आवश्यकता असल्याचे कृती दलाच्या निदर्शनास आलेले आहे. एवढया मोठया प्रमाणात लागलीच प्रकल्पग्रस्त सदनिका उपलब्ध होऊ शकत नसल्याने प्रकल्पग्रस्त सदनिकांच्या निर्मितीसाठी अधिकचे प्रयत्न करणे आवश्यक आहे. त्यासाठी खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी :-

**(१) प्रकल्पग्रस्त (पीएपी) सदनिकांच्या निर्मितीसाठी करावयाचे प्रयत्न :-**

i. बृहन्मुंबई महानगरपालिका, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई व मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण (एम. एम. आर. डी. ए.) यांनी पुढील किमान १५ वर्षात पुरेशा प्रमाणात प्रकल्पग्रस्त सदनिका निर्माण होण्याच्या दृष्टीने सविस्तर कृती आराखडा तयार करावा, जेणेकरुन भविष्यात पायाभूत प्रकल्प पूर्ण करण्यास विलंब होणार नाही.संबंधित प्राधिकरणांनी पुढील ३-५ वर्षात किती प्रकल्पग्रस्त सदनिकांची निकड आहे व किती सदनिका निर्माण होणार आहेत, याचा आढावा घेण्यात यावा.

ii. विकास हक्क हस्तांतरणाची निर्मिती व त्याची उपयोगिता यासंबंधातील विनियम २०३४ मधील तरतूदींचा पुनर्विचार करुन, विनियम ३३ (१०) मधील नियम ३.११ मध्ये प्रकल्पग्रस्त सदनिका निर्माण करणे व त्याचा वापर करण्यासंदर्भातील तरतुदींमध्ये सुधारणा करण्यात यावी. जेणेकरुन प्रकल्प आर्थिकदृष्ट्या वर्धनक्षम ठरेल.

iii. बृहन्मुंबई महानगरपालिका, म्हाडा यांच्याकडून राबविण्यात येणाऱ्या विनियम-२०३४ च्या विनियम ३३(७) व ३३(९) च्या प्रकल्पांमध्ये निर्माण होणाऱ्या अतिरिक्त सदनिका प्रकल्पग्रस्त सदनिका म्हणून वापरात आणाव्यात.

iv. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपुप्रा, मुंबई यांनी बृहन्मुंबई महानगरपालिका व एम. एम. आर. डी. ए. यांना विनियम ३३ (१०) च्या सोयीस्कर योजना

सुचवाव्यात, ज्यामध्ये पी.ए.पी. सदनिकांकरिता सदर योजनेतील विक्री घटक बृहन्मुंबई महानगरपालिका व एम. एम. आर. डी. ए. घाऊक खरेदी करेल.

v. शासकीय जमिनी, केंद्र सरकारच्या अखत्यारीत असलेल्या मिठागराच्या जागा, मुंबई पोर्ट ट्रस्ट (MbPT) यांच्या जागा पीएपी सदनिका बांधण्याकरिता उपलब्ध करून घेण्यासाठी नगर विकास विभागाने संबंधित यंत्रणांकडे पाठपुरावा करावा.

vi. विनियम ३३(१०) चे उपखंड ३.११ अन्वये पी.ए.पी. सदनिका निर्माण झाल्यानंतर त्या मोबदल्यात विकासकाला विनियम-३२ (A) मधील उपविनियम ४.२ च्या तरतुदीमधील विकासकास बांधिव क्षेत्राकरिता नमूद केलेल्या सुत्रातील सध्याच्या १.५० या गुणांकात वाढ करावी, असे केल्यास बांधिव सुविधा (Construction Amenities) टिडीआर (TDR) मध्ये वाढ होईल.

vii. विनियम ३३ (१०) च्या उप विनियम VIII (३.८) तरतूदीनुसार झोपडपट्टी पुनर्वसन प्रकल्पामध्ये सदनिका घनता कमीत कमी ६५० प्रती हेक्टरचे प्रयोजन आहे. परंतु विकासक अतिरीक्त प्रकल्पग्रस्त सदनिका देण्यास तयार असल्यास त्यांना अतिरीक्त प्रकल्पग्रस्त सदनिकांच्या बांधकामावर विक्रीयुक्त चटईक्षेत्र निर्देशांक (Sale FSI) म्हणून पुनर्विकास घटकाच्या (Rehab Component) १.३५ च्या वर, प्रचलित सुत्रामध्ये मुभा दिल्यास अतिरीक्त प्रकल्पग्रस्त सदनिका उपलब्ध होऊ शकतील.

viii. विनियम ३३ (१०) मध्ये पीएपी सदनिकेच्या बांधकामावर आकारण्यात येणाऱ्या विविध प्रिमीयमच्या मोबदल्यात किंवा प्रिमीयमऐवजी प्रकल्पग्रस्त सदनिका घेण्यात (adjustment) याव्यात, म्हणजे अतिरिक्त पीएपी सदनिका उपलब्ध होऊ शकतील.

ix. विविध नियोजन प्राधिकरणाच्या (Planning Authority) योजना एकत्रिकरण करण्याची मुभा देऊन, विकासकाने पीएपी सदनिका दिल्यास विक्रीयुक्त घटकासाठी (Sale Component) भराव्या लागणाऱ्या अधिमुल्यामध्ये ५० टक्के पर्यंत अधिमूल्य समायोजित (adjust) करण्याची मुभा देण्यात यावी.

x. सार्वजनिक प्राधिकरणाच्या मालकीची जमीन (बांधिव/मोकळ्या/आरक्षित) कोणत्याही झोपडपट्टी पुनर्वसन योजनेच्या लगत असल्यास व सार्वजनिक प्राधिकरणाने रितसर ना-हरकत दिल्यास, असा भूखंड झोपडपट्टी योजनेच्या शेजारील विकासकाने, त्या सार्वजनिक प्राधिकरणाच्या जमिनीच्या अनुज्ञेय चटई क्षेत्र निर्देशांकामध्ये (FSI) पीएपी/कोणतीही सार्वजनिक बांधिव सुविधा मोफत प्रस्तावित करून विकसित केल्यास, त्या झो.पु. योजनेच्या विकासकास विनियम ३३(१०) पोटनियम ७.१ नुसार भूखंड लगतच्या योजनेत समाविष्ट करुन इन-सीटू FSI देण्यात यावा.

xi. एखादा विकासक खाजगी तसेच सार्वजनिक प्राधिकरणाच्या मालकीच्या जमिनीवर विनियम ३३ (१०) च्या उपखंड ३.११ अंतर्गत योजना राबवित असतांना त्या जमिनीवर झोपड्या असतील तर, सदर झोपड्या त्याच जागेवर विकसित करुन विकासकास सदर योजनेचे समायोजन (Clubbing) करत असतांना, त्या योजनेचा अनुज्ञेय असलेला इन-सीटू विक्री बांधीव क्षेत्रफळ हस्तांतरीत करतांना ज्या योजनेबरोबर समायोजन करावयाचे आहे तेथील झोपडीधारक यांची अदलाबदल करण्याची आवश्यकता राहणार नाही.

xii. विनियम ३३ (१०) चे उपखंड ३.११ अंतर्गत योजना कार्यक्षम करण्यासाठी जर विकासकाची इच्छा असल्यास किंवा पीएपी योजनेसाठी कोणतीही जमीन/प्लॉट विकसित करण्यासाठी प्राधिकरणाने परवानगी दिल्यास, योजनेच्या समायोजनेचा (clubbing) आग्रह न धरता, त्याच प्रभागात अनुज्ञेय इन-सीटू विक्री बांधिव क्षेत्रफळ हस्तांतरीत करून परवानगी देण्यात यावी. असे केल्यास सदर योजनेला चालना मिळेल व त्यामुळे प्रकल्प आर्थिक दृष्ट्या वर्धनक्षम होण्यास प्रोत्साहन मिळेल.

xiii. विनियम ३३ (११) नुसार मिळणाऱ्या एकूण चटईक्षेत्र निर्देशांकांपैकी ५० टक्के पीटीसी सदनिका पीएपी सदनिका म्हणून परिवर्तीत करण्यात याव्यात. तसे केल्यास मोठ्या प्रमाणात पीएपी सदनिका उपलब्ध होऊ शकतील

**<u>(२) प्रकल्पग्रस्त सदनिकांच्या वितरणासाठी प्राधान्यक्रम ठरविणे</u> :-**

बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रात प्रकल्पबाधितांना सदनिका उपलब्ध करुन देण्यासाठी नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.बीएमसी-२०२३/प्र.क्र.६०६/नवि-२१, दि.१४/०३/२०२४ अन्वये समन्वय समिती गठित करण्यात आली आहे. बृहन्मुंबईमध्ये सध्या सुरु असलेले व भविष्यात हाती घेण्यात येणाऱ्या विविध सार्वजनिक पायाभुत प्रकल्पांचे व्यापक जनहित (larger public interest), त्यामुळे विस्थापित होणाऱ्या नागरिकांची/ झोपडीधारकांची संख्या यांचा सारासार विचार करुन, प्रकल्पग्रस्त सदनिकांच्या उपलब्धतेनुसार प्राधान्यक्रम ठरविण्याचे अधिकार या समन्वय समितीला देण्यात येत आहेत.

**<u>(३) प्रकल्पग्रस्त सदनिकांच्या वितरणासाठी कार्यपध्दती</u> :-**

१. प्रकल्पग्रस्त सदनिकांच्या वितरणासाठी ऑनलाईन प्रणाली बृहन्मुंबई महानगरपालिका व एमएमआरडीए यांनी तयार करावी.
२. प्रकल्पग्रस्तांच्या पात्रतेबाबतचे परिशिष्ट-२ हे ऑनलाईन व पारदर्शक असावे.
३. प्रकल्पग्रस्त सदनिका ह्या शक्यतो आहे त्याच ठिकाणी उपलब्ध करुन द्याव्यात.

त्या ठिकाणाचा प्राधान्यक्रम खालीलप्रमाणे राहील -

अ) आहे त्याच विभागामध्ये (वॉर्ड)

ब) विभागामध्ये शक्य नसल्यास लगतच्या विभागामध्ये किंवा झोनमध्ये

क) झोनमध्ये शक्य नसल्यास, उपलब्धतेनुसार उत्तर दिशेच्या विभागामध्ये किंवा झोनमध्ये असा निश्चित करण्यात यावा.

**(४) प्रकल्पग्रस्त सदनिका वाटप करण्याकरिता विहित शुल्क, अटी व शर्ती ठरविणे :-**

i. प्रकल्पग्रस्त सदनिकाधारकाला वितरीत केलेल्या वितरण आदेशाची मुदत ४५ दिवस राहील. ४५ दिवसानंतर ती मुदत आपोआप संपुष्टात येईल. अशा परिस्थितीत त्याचे राहते मूळ बांधकाम जमिनदोस्त झाल्यास त्याची जबाबदारी रहिवाश्याची असेल.

ii. प्रकल्पग्रस्त सदनिकाधारकाने सदनिका प्राप्त झाल्यावर संबंधित सहकारी गृहनिर्माण संस्थेचे सभासद होण्यासाठी अर्ज करणे आवश्यक राहील. तसेच प्रकल्पग्रस्त सदनिकेचा ताबा घेण्यासंदर्भात आवश्यक अटी व शर्ती बंधनकारक असल्याबाबतचे बंधपत्र देणे आवश्यक राहील.

iii. वितरीत झालेली प्रकल्पग्रस्त सदनिका ताबा घेतल्यापासून ५ वर्षांपर्यंत विकता येणार नाही.

iv. प्रकल्पग्रस्त सदनिकांच्या नियमित देखभाल दुरुस्तीसाठी संबंधित निविदाकार/विकासक किंवा प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणा यांनी रु.४०,०००/- प्रमाणे राखीव निधी जमा करणे आवश्यक राहील.

**(५) कृती दलाच्या शिफारशींच्या अनुषंगाने प्रकल्पग्रस्त सदनिकांच्या प्रकल्पासंदर्भातील अन्य अटी व शर्ती :-**

i. प्रकल्पग्रस्त सदनिकांच्या निर्मितीसाठी बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत विकासकांना क्रेडिट नोटचा पर्याय देण्यापूर्वी, बृहन्मुंबई महानगरपालिकेने केंद्र व राज्य शासनाच्या प्रचलित वित्तीय अधिनियमातील तरतुदींच्या अनुषंगाने याबाबत वित्तीय/कर निर्धारण क्षेत्रातील तज्ञांचे अभिप्राय घेऊन पुढील उचित कार्यवाही करावी.

ii. प्रकल्पग्रस्त सदनिकांसाठी निविदाकार/विकासकाकडून दर आकारताना वार्षिक दरसुचीतील दरापेक्षा कोणत्याही परिस्थितीत अधिक असू नये. तथापि, टीडीआर व क्रेडीट नोट नुसार कंन्स्ट्रक्शन टीडीआर देत असतील तर दोन्ही घटकांचे एकत्रित बाजारमूल्य वार्षिक दरसूचीप्रमाणे येणाऱ्या दरापेक्षा जास्त असू नये.

**(६)** बृहन्मुंबई विकास प्रोत्साहन नियंत्रण नियमावली - २०३४ मधील ३३ (११) मध्ये निर्माण होणाऱ्या पीटीसी सदनिका ह्या झोपु प्राधिकरणाकडील योजनेतील झोपडीधारकांना संक्रमण शिबीरे म्हणून वापरात आणाव्यात.

**(७)** बृहन्मुंबई महानगरपालिकेकडून पीएपी सदनिकेऐवजी प्रकल्पग्रस्तांना आर्थिक मोबदला रु.२५.०० लक्ष इतका देण्यात येतो. त्यामुळे बृहन्मुंबई महानगरपालिका व इतर नियोजन प्राधिकरणांना झोपु प्राधिकरणाकडून प्रकल्पग्रस्त सदनिका उपलब्ध करुन देतांना, वरील आर्थिक मोबदल्याच्या ५०% रक्कम म्हणजेच रु.१२.५० लक्ष इतकी रक्कम, संबंधित प्राधिकरणांनी झोपु प्राधिकरणाला प्रदान करावी.

**(८)** प्रस्तुत धोरणाच्या अनुषंगाने अंमलबजावणी करतांना येणारा आर्थिक भार/खर्च संबंधित प्राधिकरण/ स्थानिक स्वराज्य संस्थांनी स्व-उत्पन्नातून भागवावा.

**(९)** या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. (१) मधील अ.क्र. (ii), (vi), (vii), (viii) व (xiii) संदर्भात बृहन्मुंबई विकास प्रोत्साहन नियमावली-२०३४ (DCPR-२०३४) मध्ये आवश्यक ते बदल/सुधारणा करण्याची कार्यवाही नगर विकास विभागाने तपासून करावी.

**(१०)** या निर्णयाची अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने (विनियम २०३४ मध्ये करावयाच्या सुधारणा वगळता) काही अनुषंगिक बदल करावयाचे झाल्यास ते बदल करण्याचे अधिकार गृहनिर्माण विभागास राहतील.

**(११)** प्रस्तुत शासन निर्णयातील तरतुदी ह्या, हा शासन निर्णय निर्गमीत झाल्याच्या दिनांकापासुन लागू राहतील.

**(१२)** सदरचा शासन निर्णय मंत्रिमंडळाच्या दिनांक ०७ ऑगस्ट, २०२४ रोजी झालेल्या बैठकीमध्ये घेतलेल्या निर्णयास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**(१३)** सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२४०८१९१७३४४३६६०९ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ARVIND TULSHIRAM SHETE

Digitally signed by ARVIND TULSHIRAM SHETE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT,
2.5.4.20=d33ed79e4d2d2921d0ca79b9de78fffaa75e5ff9801ced3d15f5ca38bf6aab62, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=822DCC756FFE36BFE50F258EB6574FFEF985EA24E97243442A9C1B3323AACA40, cn=ARVIND TULSHIRAM SHETE
Date: 2024.08.19 17:50:35 +05'30'

**( अरविंद शेटे )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्षनेता विधान परिषद/मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

५. मा. उप सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. सर्व सन्मा. विधानसभा, विधान परिषद सदस्य व संसद सदस्य
८. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
९. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
१०. मा. मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१२. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
१३. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र - १, मुंबई.
१५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
१६. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
१७. सर्व महानगरपालिका आयुक्त (बृहन्मुंबई महानगरपालिका वगळून)
१८. महानगर आयुक्त, मुंबई महानगर व प्रदेश विकास प्राधिकरण, वांद्रे (पूर्व), मुंबई
१९. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन,वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
२०. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई / पुणे-चिंचवड क्षेत्र / नागपूर/ठाणे.
२१. विशेष कार्य अधिकारी, धारावी पुनर्वकास प्रकल्प, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
२२. जिल्हाधिकारी, मुंबई शहर / मुंबई उपनगर जिल्हा
२३. अपर जिल्हाधिकारी (अति./निष्का.) मुंबई शहर / पश्चिम उपनगरे / पूर्व उपनगरे
२४. मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
२५. मुख्य अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
२६. गृहनिर्माण विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी
२७. निवड नस्ती (झोपनि-२)